राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम
मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण सोसायटी, मुंबई
नवीन लेखाशीर्ष उघडण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनिका-२०१४/प्र.क्र.१४२/आरोग्य-५,**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
१० वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १० डिसेंबर, २०१४

वाचा -

1) महाराष्ट्र शासनाच्या नियोजन विभागाचे क्र. केंपुयो २०१४/०८/का.१४१४, दि.१८ जानेवारी, २०१४ चे पत्र.
2) मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, मुंबई यांचे क्र. मुं.जि.ए.नि.सं./२१४१/प्र.सं., दि.२९.०५.२०१४ चे पत्र.
3) प्रधान महालेखाकार कार्यालय (लेखा व हकदारी) यांचे क्र. टीएम/सीएच.१/पीएचडी/ युओआर/१५५, दि.०४.१२.२०१४ चे पत्र.

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या नियोजन आयोगाने सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये केली आहे. सदर योजनांमध्ये राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम ह्या योजनेचा देखिल समावेश आहे. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षापासून ह्या योजनांचा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे संबंधीत यंत्रणांना वितरीत होणार असल्याने, ह्या योजनांसाठी सर्व संबंधीत प्रशासकीय विभागांनी नवीन लेखाशीर्ष घेण्याबाबत नियोजन विभागाने वरील संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये सुचना दिल्या आहेत. त्यानुसार राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेस प्राप्त होणारा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वाटप करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि महालेखापाल यांनी अनौचारिक संदर्भ क्र.टीएम/सीएच.१/पीएचडी/ युओआर/१५५, दि.०४.१२.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेस निधी वितरणासाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

| मागणी क्र. आर-१ | Demand No. R-1 |
|---|---|
| २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य | 2210 – Medical and Public Health |
| ०६- सार्वजनिक आरोग्य | 06 – Public Health |
| १०१ - रोग प्रतिबंध व नियंत्रण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना | 101 – Prevention and Control of Diseases Five Year Plan Scheme |
| १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना | 100% Centrally Sponsored Scheme |
| ०१- रोग प्रतिबंध व नियंत्रण | 01- Prevention and Control of Diseases |
| (०१) (५६) राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम (मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, मुंबई) | (01) (56) National Aids Control Programme (Mumbai District Aids Control Society, Mumbai) |
| ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | 31- Grant-in-Aid (Non Salary) |
| (२२१० जी००१) | (2210 G001) |

सदर लेखाशिर्षातंर्गत मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्थेस वितरीत होणाऱ्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना व वितरीत अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून पारित करुन घेण्याकरिता प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून याद्वारे घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३९९/२०१/व्यय-१३, दि.२४.११.२०१४ व अनौ.संदर्भ क्र.२७१-अर्थ-९, दि.२६.११.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई यांनी अनौपचारिक संदर्भ क्र. टीएम/सीएच.१/पीएचडी/ युओआर/१५५, दि.०४.१२.२०१४ द्वारे दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१०१५०५१६१२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jadhav Jayshree S

Digitally signed by Jadhav Jayshree S
DN: CN = Jadhav Jayshree S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.12.10 16:27:26 +05'30'

( ज. सु. जाधव )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रकल्प संचालक, मुंबई जिल्हे एड्स नियंत्रण संस्था, वडाळा, मुंबई.
५. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, वडाळा, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½ मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र ½ मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे मुंबई.
११. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१२. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्यासन-१४७२), मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-०९), मंत्रालय मुंबई
१६. अवर सचिव, (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती (आरोग्य-५)